कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग(खुद्द), मंत्रालय तसेच कृषि आयुक्तालय, पुणे, यांना सन २०१७-१८ या आर्थिक वर्षामध्ये ई-गव्हर्नन्स कार्यक्रम राबिवण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत .

**महाराष्ट्र शासन**
**कृषि पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र. संगणक - २०१७/३२४/प्र.क्र.५५/१३-अे**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**
**मंत्रालय मुंबई-४०० ०३२**
**दिनांक - ११ जुलै, २०१७**

वाचा:-१) शासन निर्णय, कृषि पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग क्र. लेखानु- ०१७/प्र.क्र ४३/१७/२-अे दिनांक १३ एप्रिल २०१७ चे सहपत्रानुसार.
२) शासन निर्णय क्रमांक अंदाज-२०१७/(प्र.क्र.४३/१७)/२-अे, दिनांक १३ एप्रिल २०१७.

प्रस्तावना :-

कृषि आयुक्तालय, पुणे तसेच कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग (खुद्द), मंत्रालय मुंबई-३२, चे संगणकीयदृष्ट्या बळकटीकरण व्हावे यासाठी ई-गव्हर्नन्स कार्यक्रम ही योजना राबविण्यात येते. कृषि, पदुम विभाग (खुद्द) व कृषि आयुक्तालयामार्फत ई-गव्हर्नन्स कार्यक्रमांतर्गत विविध उपक्रम राबविण्यात येतात. तसेच विविध उपक्रमांचे नियोजन करण्यात येते. सदर योजने अंतर्गत राज्य शासनातर्फे दरवर्षी ठराविक रक्कम मंजूर करण्यात येते व सदर मंजूर झालेली रक्कम कृषि, पदुम विभाग (खुद्द)मंत्रालय,मुंबई-३२ तसेच कृषि आयुक्तालय, पुणे यांना विभागून वितरीत करण्यात येते.

ई-गव्हर्नन्स कार्यक्रम ही योजना योजनांतर्गत योजना असून सन २०१७-१८ या वित्तीय वर्षामध्ये सदर योजनला **"मागणी क्र.डी-७-३४५१, सचिवालय- आर्थिक सेवा, पंचवार्षिक योजनांतर्गत (०२) योजना (०२)(०४) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम** अंमलबजावणीकरिता योजना (कृषि) (३४५१ २७८२)" या लेखाशिर्षाखाली संदर्भ क्र.२ नुसार रक्कम रूपये २५०.०० लाख इतका निधी उक्त प्रयोजनासासाठी कृषि, पदुम विभाग(खुद्द)मंत्रालय,मुंबई-३२ तसेच कृषि आयुक्तालय, पुणे यांना वितरीत करण्यासाठी सदर योजनेस प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय

कृषि आयुक्तालय, पुणे तसेच कृषि व पदुम विभागाचे (खुद्द) कार्यालय संगणकीयदृष्टया बळकटीकरण व्हावे यासाठी **"ई-गव्हर्नन्स कार्यक्रम"** ही योजनांतर्गत योजना राबविण्यात येत असून सन २०१७-१८ या वित्तीय वर्षामध्ये या दोन्ही कार्यालयांसाठी सदर योजने अंतर्गत **"मागणी क्र.डी-७-३४५१ सचिवालय- आर्थिक सेवा, (०२) (०४) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम अंमलबजावणीकरिता योजना (कृषि) (३४५१ २७८२)" या लेखाशिर्षाखाली रु.२५०.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.** यापैकी वित्त विभागाने अर्थसंकल्पीत निधीच्या ८०% चे प्रमाणात रू.२००.०० लाख इतका निधी खर्च करण्यासाठी वितरीत केला आहे. सदर निधी कृषि व पदुम विभागाचे (खुद्द) व कृषि आयुक्तालय,पुणे

यांच्या संगणक बळकटीकरणासाठी खर्च करण्याच्या योजनेस खालीलप्रमाणे प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

**(अ)** संदर्भिय-२ चे शासन निर्णयानुसार कृषि आयुक्तालयामार्फत खालीलप्रमाणे ई-गव्हर्नन्स कार्यक्रम निधी उपलब्धतेनुसार राबविण्यात यावा.

| **अ.क्र** | **बाब** | **प्रस्तावित निधीरक्कम रु.लाखात** |
|---|---|---|
| १ | हार्डवेअर (संगणक, प्रिंटर, सर्व्हर, युपीएस, टोल फ्री व्यवस्था, देखभाल व दुरुस्ती)AMC /FMSव मनुष्यबळ व्यवस्थापन (आयुक्तालय स्तर) | ४२.०० |
| २ | कनेक्टिव्हिटी - आयुक्तालय स्तरावरील नेटवर्किंग. बीएसएनएल कनेक्टिव्हिटी देयकेब्रॉड बँण्ड सेवा देणेसाठी Wi- Fi Router व तद्अनुषंगिक साहित्य खरेदी | १७.०० |
| ३ | NICSI मनुष्यबळ वेतन अदायगी | ११.०० |
| ४ | सॉफ्टवेअरखरेदी (आज्ञावल्या/मोबाईल ॲप- नविन, अद्यावत करणे, देखभाल करणे, सुरक्षा प्रमाणपत्र मिळविणे)- अँण्टी व्हायरस खरेदी. | २०.०० |
| ५ | हार्डवेअरखरेदी- (डेस्कटॉप, सर्व्हर, प्रिंटर, स्कॅनर, UPS व बॅटरी, फोटो कॉपी यंत्र इ.बाबी करीता आयुक्तालय स्तर) | ५०.०० |
| ६ | SPMU(सल्लागार,डाटा एन्ट्री ऑपरेटर वेतन) | १०.०० |
| **एकूण रक्कम रूपये** | | **१५०.००** |

उपरोक्त बाबींसाठी रूपये १५०.०० लाख खर्च करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

बाबनिहाय ई-गव्हर्नन्स कार्यक्रम राबविण्याची कामे व तपशील खालीलप्रमाणे.

१) **आयुक्तालय स्तर हार्डवेअरचे व्यवस्थापन** - कृषि आयुक्तालयामार्फत ई-गव्हर्नन्स कार्यक्रमाअंतर्गत विविध उपक्रम राबविण्यात येतात. त्याअंतर्गत तांत्रिक मनुष्यबळाच्या सेवा विहीत कार्यपध्दतीने उपलब्ध करुन घेऊन संगणक प्रणाली विकसित करण्याचेकाम करण्यात येते. कृषि आयुक्तालय स्तरावरील हार्डवेअर देखभाल, LAN व WAN व अँण्टी व्हायरस, VC HALL यांचे व्यवस्थापन करणे, टोल फ्री व्यवस्था, देखभाल व दुरुस्ती यासाठी ई-निविदा प्रणालीनुसार AMC/FMS पध्दतीने संस्थेची निवड करण्यात आलेली असून त्यानुसार तांत्रिक मनुष्यबळ कार्यरत आहे.त्यांची देयके या निधीतून अदा करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२) **कनेक्टिव्हिटी** - आयुक्तालय स्तरावरील कनेक्टीव्हिटी व नेटवर्किंग अंतर्गत बीएसएनएल यांचे कनेक्टिव्हिटी (इंटरनेट लिज्डलाईन/सर्किट डाटालाईन इत्यादी)ची अगाऊ देयके व आयुक्तालय स्तरावरील OFC केबल, नेटवर्कींग केबल, लॅन स्विचेस, मोडेम, राऊटर, इ. कनेक्टिव्हिटीची कामे करून रक्कम अदा करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

३) **NICSI तांत्रिक मनुष्यबळ :-**रा.सू.वि.कें.(NIC) पुणे-७ यांचेमार्फत कृषि विभागाचे Rainfall Recording & Analysis, e-parvana, e-Lab, eThibak, Online Soil health Card, Organic farming website, Agriculture Census, Horticulture Census,सेवाहमी कायदा अंतर्गत सेवा व सांख्यिकी विषयक आज्ञावल्या विकसित व कार्यरत असून त्या सुस्थितीत कार्यरत राहणे, तसेच वेळोवेळी डाटा अपडेशन करणे व त्यामध्ये तांत्रिक अडी-अडचणी निर्माण होऊ नये यासाठी NIC, पुणे येथे मानधनावर NICSI यांचेमार्फत नियुक्त करण्यात आलेल्यां तांत्रिक मनुष्यबळाची Proforma Invoice द्वारे प्राप्त अगाऊ देयकाची अदायगी या निधीतून करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४) **सॉफ्टवेअर खरेदी -** तसेच कृषि विभागासाठी आवश्यक असणा-या सर्व आज्ञावली जसे पिक कापणी प्रयोग, MIS, e-Service Book, DBT,PFMS, Agriculture Web Portal, Intraagri Website, Public Grievance, फलोत्पादन रोपे व कलमे आणि कृषि विषयक औजारे सयंत्रे उपलब्धता इ.विषयक आज्ञावलींचे/मोबाईल ॲपलिकेशनचे विकसन व खरेदीची प्रक्रीया, Software Requirement Specification(SRS), सुरक्षा प्रमाणपत्र मिळविणे, Hosting करणे, वापर कर्त्यांना प्रशिक्षण देणे अशा विविध टप्प्याची असून सॉफ्टवेअर विकसन व देखभाल तसेच खरेदीचा खर्च या निधीतून करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

५) **हार्डवेअर :-** कृषि आयुक्तालयातील कालबाह्य व मुदतबाह्य झालेले डेस्कटॉप, प्रिंटर, **दहा ते बारा वर्षापूर्वीचे सध्यस्थितीमध्ये कार्यरत असलेले सर्व्हर**, युपीएस व बॅटरी,स्कॅनर इ.तद्नुषंगिक साहित्या निर्लेखित करून त्या ऐवजी नव्याने सदरच्या प्रकारचे हार्डवेअर खरेदीस मंजूरी देण्यात येत आहे. तसेच आयुक्तालय स्तरावर मागणी नुसार संगणक, प्रिंटर, स्कॅनर, लॅपटॉप, All in One Printer आणि ई-गव्हर्नन्स कार्यक्रमाची अंमलबजावणी संगणक प्रकल्प शाखेमार्फत होत असल्याने सदर कार्यालयासाठी विद्युत फोटो कॉपी यंत्र खरेदी करणेस या निधीतून मंजूरी देण्यात येत आहे.

६) **राज्य प्रकल्प व्यवस्थापन युनिट (सल्लागार,डाटा एन्ट्री ऑपरेटर वेतन) :-** कृषि विभागचा संगणक व माहिती तंत्रज्ञान विषयक कार्यक्रम तयार करणे, अद्ययावत तंत्राचा अवलंब करणे यासाठी शासन मान्यतेने माहिती तंत्रज्ञान विषयक सल्लासेवा, सल्लागार सेवा प्राप्त करून घेणे व विविध आज्ञावलीतील माहिती अद्ययावत ठेवणेसाठी डाटा एन्ट्री ऑपरेटर यांच्या सेवा आवश्यक असतात. अशा प्रकारे शासन मान्यतेने करण्यात येणा-या सल्ला सेवा, सल्लागार सेवा व डाटा एन्ट्री ऑपरेटर यावरील खर्च या निधीतून अदा करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

**ब) कृषि व पदुम विभाग(खुद्द)** :- सर्व मंत्रालयीन विभागात ई-ऑफिस प्रणालीचा अवलंब करण्याच्या सूचना सामान्य प्रशासन विभागाच्या दि. ५ मार्च २०१३ च्या परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या आहेत. त्यानुसार ई-ऑफीस प्रणालीचा वापर सर्व कार्यासनातून प्रभावीपणे होण्याच्या दृष्टीने विभागातील सर्व अधिकारी/कर्मचारी यांच्याकडे संगणक तसेच तत्सम अनुषंगिक सुविधा असणे आवश्यक आहे.

सध्या विभागाकडे बरेचशे संगणक जुने असल्याने वारंवार बिघडत असतात. सद्यस्थितीत विभागाच्या साठ्यामध्ये एकही संगणक शिल्लक नाही. त्यामुळे विभागातील अधिकारी/कर्मचारी यांचा संगणक नादुरुस्त झाल्यास त्यांना तातडीने नवीन संगणक पुरविणे शक्य होत नाही. एप्रिल २०१७ ते मार्च २०१८ या कालावधीत तातडीच्या वेळी नादुरुस्त संगणकाच्या ऐवजी नवीन संगणक देण्यासाठी विभागाकडे कमीत कमी १० संगणक विभागाच्या साठ्यामध्ये शिल्लक असणे आवश्यक आहे. तसेच ब-याच कार्यासनांकडून जुने प्रिंटर व्यवस्थित चालू नसल्याने नवीन प्रिंटरची/स्कॅनरची मागणी करण्यात येत आहे. प्रत्येक हॉलमध्ये एक स्कॅनर यापूर्वीच देण्यात आलेला आहे. तथापि, ई-ऑफीस तसेच इतर कागदपत्रे स्कॅन करण्यासाठी ब-याच कार्यासनांकडून स्कॅनरची मागणी होत आहे. विभागातील संगणकीकरणाचे बळकटीकरण करण्याच्या उद्देशाने सन २०१७-१८ या आर्थिक वर्षामध्ये वरील साधनसामुग्री विभागास उपलब्ध करुन द्यावयाची आहे. **यासाठी रूपये ५०.०० लाख खर्चास प्रशासकीय व वित्तिय मान्यता देण्यात येत आहे.**

उपरोक्त **"अ"** व **"ब"** विचारात घेऊन कृषि व पदुम विभाग (खुद्द),मंत्रालय तसेच कृषि आयुक्तालय पुणे या कार्यालयांना सन २०१७-१८ या आर्थिक वर्षामध्ये ई-गव्हर्नन्स कार्यक्रम राबविण्यासाठी संदर्भ क्रमांक-१ नुसार २५०.०० लाख इतक्या रकमेचे योजनेस प्रशासकीय मान्यता व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

**वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०१७/प्रक्र७५/अर्थ-३, दिनांक १८/०४/२०१७ नुसार एकूण रूपये २५०.०० लाख रक्कमे पैकी ८०% मर्यादेत २००.०० लक्ष रक्कम इतका निधी मंजूर असून तो कृषि व पदुम विभाग (खुद्द),मंत्रालय,मुंबई कार्यालयासाठी रूपये ५०.०० लाख आणि कृषि आयुक्तालय,पुणे स्तरावर रूपये १५०.०० लाख याप्रमाणे निधी ई-गव्हर्नन्स कार्यक्रम राबविण्यासाठी वितरीत करण्यात येत आहे. मंत्रालयीन विभागाच्या स्तरावर ई-गव्हर्नन्स अंतर्गत करावयाच्या कामाच्या खर्चाबाबत बाबनिहाय तपशिल आस्थापना शाखेने उपलब्ध करुन द्यावा. त्यानुसार निधी वितरीत करण्याची कार्यवाही करण्यात येईल.**

**प्रस्तुत प्रकरणी आयुक्त कृषी कार्यालायाकरिता संचालक आत्मा महाराष्ट्र राज्य पुणे यांना नियंत्रण अधिकारी व सहाय्यक संचालक (लेखा-१) यांना आहारण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच कृषी व पदुम विभाग (खुद्द) मंत्रालय याकरिता निधी आहारणाच्या प्रयोजनार्थ उप सचिव (प्रशा.) यांना नियंत्रण अधिकारी व अवर सचिव (प्रशासन) यांना आहारण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.**

**मंजूर कार्यक्रमानुसार वितरीत निधीच्या प्रमाणात कार्यक्रम राबवून खर्च करण्यात यावा सदरचा खर्च हा माहिती व तंत्रज्ञान विभाग व सामान्य प्रशासन विभाग यांना वेळोवेळी दिलेल्या सूचना व निर्देशानुसार करण्यात यावा.**

तसेच सदर निधीस प्रशासकीय मान्यता ज्या प्रयोजनांसाठी दिलेली असली तरी सदर प्रयोजनांसाठी कमी अधिक खर्च होण्याची शक्यता विचारात घेता सदर प्रयोजनांमध्ये अंतर्गत बाबनिहाय

बदल करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. प्रस्तुतचे आदेश प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारात निर्गमीत करण्यात येत आहेत.

सदर आदेश वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०१७/प्रक्र७५/अर्थ-३, दिनांक १८/०४/२०१७ च्या परिपत्रकानुसार अटीची पुर्तता करण्याच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७१११२२५०२२३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kamlakar Yeshvant Vanjare

Digitally signed by Kamlakar Yeshvant Vanjare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=AGRICULTURE AND ADF DEPT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c08eef62183520696d2005b153b8cc2a552337a23fc4d457a4434216d9324c3b, serialNumber=6fd0ddfb9412fda09432e5f8a3e140c065770ba4ca63ef6fc5ba354810e2828b, cn=Kamlakar Yeshvant Vanjare
Date: 2017.07.11 12:25:19 +05'30'

**(क.य. वंजारे)**
**शासनाचे उपसचिव**

**प्रति,**

१) आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे
२) अवर सचिव (आस्थापना), कृषि व पदुम विभाग (खुद्द) मंत्रालय, मुंबई-३२

**प्रत-**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय मुंबई-३२
२) मा.अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक,कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
३) उप सचिव (प्रशासन) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४) उपसचिव (फलोत्पादन) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५) संचालक (फलोत्पादन) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६) संचालक (आत्मा) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७) सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
८) महालेखापाल१/२ (लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर
९) वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१०) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई/अधिदान व लेखा कार्यालय मुंबई
११) सहसंचालक, लेखा व कोषागारे,संगणक कक्ष नवीन प्रशासकीय भवन ५ वा मजला,मुंबई-३२.
१२) निवडनस्ती (१३-अे कार्यासन) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.